संचालनालय लेखा व कोषागारे तसेच
स्थानिक निधी लेखापरीक्षा संचालनालयाच्या
आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचारी यांच्या
<u>बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.१३१/कोषा प्रशा-३**
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३० मे, २०१५.

<u>वाचा -</u>

१) सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्रमांक :-एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २८४/प्रक्र३६२ /१२, दि.२६.११.२०१४
२) सामान्य प्रशासन विभाग,अधिसूचना क्रमांक :-एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४ /१२,दि.२५ मे २००६.
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१४/प्र.क्र.१३१/कोषा प्रशा-३, दि.३१ मार्च, २०१५.

.......................................................................................................................

वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१४/प्र.क्र.१३१/कोषा प्रशा-३, दि.३१ मार्च, २०१५ अधिक्रमित करण्यात येत आहे.

<u>प्रस्तावना -</u>

मा.मुख्यमंत्री यांनी प्रशासनातील कालापव्यय टाळून, निर्णय प्रक्रियेतील टप्पे कमी होण्याच्या दृष्टीने, विभागातील तसेच त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचा-यांचे बदल्यांच्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्याच्या सूचना केल्या आहेत. त्यानुषंगाने, सर्व प्रशासकीय विभागांनी महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील कलम ६ खालील परंतुक २ व कलम ७ यामधील तरतूदी एकत्रित विचारात घेवून, बदली करण्यास सक्षम प्राधिका-यांचे बदल्यांचे अधिकार, त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिका-याकडे प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही त्वरीत करावी, असे संदर्भाधिन परिपत्रकान्वये शासन आदेश आहेत. त्यानुषंगाने महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील अधिकारी यांच्या तसेच संचालनालय, लेखा व कोषागारे व स्थानिक निधी लेखापरीक्षा, संचालनालय यांच्या आस्थापनेवरील कर्मचारी यांच्या बदली संदर्भात सक्षम प्राधिका-यांकडे बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्यानुषंगाने आता बदली करण्याचे अधिकार पुढीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२६.११.२०१४ च्या परिपत्रकास अनुसरुन महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम-६ अन्वये बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांचे अधिकार महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील अधिकारी तसेच संचालनालय, लेखा व कोषागारे व स्थानिक निधी लेखापरीक्षा संचालनालय यांच्या आस्थापनेवरील कर्मचारी यांच्या बदली/पदस्थापने संदर्भात पुढीलप्रमाणे सक्षम प्राधिका-यांकडे प्रत्यार्पित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | शासकीय अधिकारी/कर्मचा-यांचे गट | बदली/पदस्थापनेचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात आलेले सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| १) | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट-अ व वेतन बँड रु.१५६००-३९१०० +ग्रेड वेतन रु.६६००/- व त्यापेक्षा अधिक वेतनश्रेणी असलेले सर्व अधिकारी.<br>महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील सर्व गट-अ आणि वरिष्ठ राजपत्रित अधिका-यांच्या विनंती बदल्यांसाठी सक्षम प्राधिकारी मा. मंत्री, वित्त व नियोजन हे राहतील. | मा.मंत्री (वित्त व नियोजन) |
| २) | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट-अ व वेतन बँड रु.१५६००-३९१०० +ग्रेड वेतन रु.५४००/- असलेले सर्व अधिकारी.<br>महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील सर्व गट-ब राजपत्रित व अराजपत्रित अधिका-यांच्या विनंती बदल्यांसाठी सक्षम प्राधिकारी अपर मुख्य सचिव (वित्त) हे राहतील. | अपर मुख्य सचिव(वित्त) |
| ३) | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट "ब (राजपत्रीत)" व वेतनबँड रु.९३००-३४८०० +ग्रेड वेतन रु.४६००/- मधील सर्व अधिकारी. | संचालक, लेखा व कोषागारे |
| ४) | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट "ब (अराजपत्रीत)" लेखा व कोषागारे संचालनालयाच्या आस्थापनेवरील व वेतनबँड रु.९३००-३४८०० +ग्रेड वेतन रु.४६००/- पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले राज्यस्तरीय संवर्गातील सर्व कर्मचारी. | संचालक, लेखा व कोषागारे |
| ५) | लेखा व कोषागारे संचालनालयाच्या आस्थापनेवरील राज्यस्तरीय संवर्गातील गट-क मधील कर्मचारी (अस्थंगत संवर्ग) | संचालक, लेखा व कोषागारे |
| ६) | प्रादेशिक सहसंचालक,लेखा व कोषागारे यांच्या आस्थापनेवरील वेतनबँड रु.९३००-३४८०० +ग्रेड वेतन रु.४६००/- पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-क मधील सर्व कर्मचारी | प्रादेशिक सहसंचालक, लेखा व कोषागारे (सबंधित विभाग) |
| ७) | प्रादेशिक सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा संचालनालयाच्या आस्थापनेवरील वेतनबँड रु.९३००-३४८०० +ग्रेड वेतन रु.४६००/- पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-क मधील सर्व कर्मचारी | प्रादेशिक सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा (सबंधित विभाग) |
| ८) | जिल्हा कोषागार कार्यालयाच्या आस्थापनेवरील अस्थंगत गट-क मधील सर्व कर्मचारी | कोषागार अधिकारी (सबंधित जिल्हा) |

| ९) | सहसंचालक,लेखा व कोषागारे कार्यालयातील व जिल्हा कोषागार कार्यालयाच्या आस्थापनेवरील गट-ड मधील सर्व कर्मचारी | कोषागार अधिकारी , (सबंधित जिल्हा) |
|---|---|---|
| १०) | सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा कार्यालयातील व सहाय्यक संचालक, जिल्हा स्थानिक निधी लेखा परीक्षा यांच्या आस्थापनेवरील गट-ड मधील सर्व कर्मचारी | सहाय्यक संचालक, जिल्हा स्थानिक निधी लेखापरीक्षा ( सबंधित जिल्हा ) |

२ उर्वरित पदांबाबत बदली अधिनियमाच्या कलम ४(४) व (५) मधील तरतुदींनुसार करावयाच्या बदल्यांच्या (विनंती बदली) बाबतीत बदली/पदस्थापनेचे अधिकार मा.मंत्री (वित्त) यांना राहतील.

३. या शासन निर्णयान्वये प्रत्यार्पित केलेल्या अधिकारांव्यतिरिक्त महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील सर्व तरतूदी पूर्वीप्रमाणेच लागू राहतील.

४. सदरचे आदेश प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहतील

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१२४९१६६५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubhangi Rajan Sheth

Digitally signed by Shubhangi Rajan Sheth
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52a2ce9d32e66b1d24d51eaca64e3ebef79bd73ef9543b72097c742eb1e708a, cn=Shubhangi Rajan Sheth
Date: 2015.06.16 12:52:03 +05'30'

(शुभांगी शेठ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) प्रधान सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव , मंत्रालय, मुंबई.
३) संचालक,लेखा व कोषागारे संचालनालय,मुंबई
४) संचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा संचालनालय,कोकण भवन ,नवी मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई
६) सर्वसहसंचालक , लेखा व कोषागारे
७) सर्व सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा
८) सर्व उपसंचालक , लेखा व कोषागारे
९) सर्व उपसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा

१०) सर्व कोषागार अधिकारी /सहाय्यक संचालक, लेखा व कोषागारे
११) सर्व सहाय्यक संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा
१२) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
१३) मा. राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग,कार्यासन कोषा-१,२,३,४,५ मंत्रालय, मुंबई